**एकात्मिक बाल विकास सेवा योजनेंतर्गत पुर्व शालेय शिक्षण संच (PSE Kits) (खेळणी साहित्य) खरेदी करण्यास मान्यता देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**महिला व बाल विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः एबावि-२०२३/प्र.क्र.४०/का.६**
नवीन प्रशासन भवन, ३ रा मजला,
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : -२६ एप्रिल,२०२३

**वाचा :-** (१) केंद्र शासन महिला व बाल विकास मंत्रालय, नवी दिल्ली यांचे पत्र क्र.F.No.CD-II-१५/१/२०२२ CD-II (e-९९६०९), दिनांक २० डिसेंबर, २०२२.
(२) आयुक्त, एकात्मिक बाल विकास सेवा योजना, नवी मुंबई यांचे पत्र जा.क्र.एबाविसेयो/पुर्व शालेय शिक्षण किट/२०२३/४८९, दिनांक ७ फ़ेब्रुवारी,२०२३.
(३) शासन पत्र, महिला व बाल विकास विभाग क्र.एबावि-२०२३/प्र.क्र.४०/का.६, दिनांक ३ मार्च,२०२३.
(४) आयुक्त, एकात्मिक बाल विकास सेवा योजना, नवी मुंबई यांचे पत्र जा.क्र. एबाविसेयो/का-४ / शालेय शिक्षण संच/२०२३/१८६२, दिनांक २५ एप्रिल,२०२३.

**प्रस्तावना :-**

महिला व बाल विकास विभागामार्फत एकात्मिक बाल विकास सेवा योजने अंतर्गत ० ते ६ वर्षे वयोगटातील बालके, तसेच किशोरवयीन मुली, गरोदर व स्तनदा माता इत्यादी लाभार्थ्यांना लसीकरण, पुरक पोषण आहार, आरोग्य तपासणी, पुर्व प्राथमिक शिक्षण, संदर्भ सेवा, आहार व आरोग्य शिक्षण इ. सेवा पुरविण्यात येतात. अंगणवाडीत येणाऱ्या ३ वर्षे ते ६ वर्षे वयोगटातील बालकांकरिता अंगणवाडी केंद्रास आकार बाल शिक्षण क्रमामध्ये दिलेल्या वाचन, लेखन, गणन, पुर्वानुभव, कलानुभव, भाषानुभव, शारिरीक व विकासानुभव, परिसर परिचय व विज्ञानुभव यावर आधारित खेळ व शैक्षणिक साहित्य पुरविण्यात येते. केंद्र शासनाच्या दिनांक २०.१२.२०२२ रोजीच्या आदेशान्वये सन २०२२-२३ या आर्थिक वर्षाकरिता राज्यातील ११०४८६ अंगणवाडी केंद्राना प्रति अंगणवाडी रु. ३०००/- याप्रमाणे पुर्व शालेय शिक्षण करिता एकूण रु. ३३१४.५८ लाख एवढा APIP मंजूर आहे. त्यानुसार मंजूर APIP च्या मर्यादेत पूर्व शालेय शिक्षण संच (PSE Kits) (खेळणी साहित्य) खरेदी करण्याचे प्रस्तावित आहे.

२. आयुक्त, एकात्मिक बाल विकास सेवा योजना, नवी मुंबई यांनी अंगणवाडी केंद्रातील लाभार्थ्यांना पुर्व शालेय शिक्षण संच (PSE Kits) (खेळणी साहित्य) पुरविण्यासाठी दिनांक ०९.०३.२०२३ रोजी ई-निविदा प्रकाशित केली असून त्या अंतर्गत मे. रवी पिक्लेस ॲड स्पाईसेस इंडिया प्रा. लि. औरंगाबाद या निविदाधारकांचे दर इतर निविदाधारकांच्या दराच्या तुलनेने कमी म्हणजे रुपये २८९०/- प्रति संच असल्याने ते L1 निविदाधारक म्हणून घोषित झालेले असल्याचे नमूद करण्यात आलेले आहे. त्यानुसार अंगणवाडी केंद्र व मिनी अंगणवाडी केंद्रामधील मुलांसाठी L1 निविदाधारक मे. रवी पिक्लेस ॲड स्पाईसेस इंडिया प्रा. लि. औरंगाबाद यांचेकडून रु. ३१,९३,०४,५४०/- (अक्षरी रुपये एकतीस कोटी त्र्यान्नव लाख चार हजार पाचशे चाळीस फक्त) एवढया रक्कमेची

पुर्व शालेय शिक्षण संच (PSE Kits) (खेळणी साहित्य) खरेदी करण्यास मान्यता देण्याबाबतचा प्रस्ताव सादर केलेला आहे. सदर प्रस्तावाच्या अनुषंगाने पुर्व शालेय शिक्षण संच (PSE Kits) (खेळणी साहित्य) खरेदी करण्यास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

एकात्मिक बाल विकास सेवा योजनेअंतर्गत राज्यातील सर्व अंगणवाडी केंद्रांना पुर्व शालेय शिक्षण संच (PSE Kits) (खेळणी साहित्य) उपलब्ध करुन देण्यासाठी मे. रवी पिक्लेस ॲड स्पाईसेस इंडिया प्रा. लि. औरंगाबाद या L१ निविदाधारकाकडून रु. ३१,९३,०४,५४०/- (अक्षरी रुपये एकतीस कोटी त्र्यान्नव लाख चार हजार पाचशे चाळीस फक्त) एवढया रक्कमेची खरेदी करण्यास व त्यासाठीच्या खर्चास शासन मान्यता देण्यात येत आहे. :-

| L१ निविदा-धारकाचे नांव | साहित्याचे नांव | प्रकल्पाचा प्रकार | अंगणवाडी केंद्राची संख्या | खरेदी करावयाच्या PSE Kits ची एकुण संख्या | प्रति संच किंमत (सर्व करासहित) | एकुण खरेदीची किंमत |
|---|---|---|---|---|---|---|
| मे. रवी पिक्लेस ॲड स्पाईसेस इंडिया प्रा .लि . औरंगाबाद | पुर्व शालेय शिक्षण संच (PSE Kits) | ग्रामीण/ आदिवासी व नागरी | ११०४८६ | ११०४८६ | रु २,८९०/- | ३१,९३,०४,५४०/- |
| **एकुणांत ग्रा/आ. + नागरी** | | | **११०४८६** | **११०४८६** | **रु. २,८९०/-** | **रु.३१,९३,०४,५४०/-** |

**२. पुर्व शालेय शिक्षण संच (PSE Kits) (खेळणी साहित्य) चा पुरवठा आदेश खालील अटी व शर्तीच्या अधिन राहून निर्गमित करण्यात यावा.**

१) सदर खरेदी करतांना ई-निविदेतील अटी व शर्तीची पूर्तता करण्याची तसेच ई-निविदेत स्पष्ट केल्याप्रमाणे (Specification प्रमाणे) पुरवठा केला जाईल याची दक्षता आयुक्त, एकात्मिक बाल विकास सेवा योजना, महाराष्ट्र राज्य, नवी मुंबई यांनी घ्यावी.

२) सदरचा निधी शासनाच्या विहित धोरणानुसार व कार्यपध्दतीनुसार तसेच उपलब्धतेनुसार खर्च करणे आवश्यक राहील, याची जबाबदारी आयुक्त, एकात्मिक बाल विकास सेवा योजना, महाराष्ट्र राज्य, नवी मुंबई यांची राहील.

३) पुरवठादाराने वरीलप्रमाणे पुर्व शालेय शिक्षण संच (PSE Kits) खेळणी साहित्याचा पुरवठा प्रकल्पस्तरापर्यंत करावा. पुरवठाधारकाकडून पुर्व शालेय शिक्षण संच (PSE Kits) खेळणी साहित्य विहित कालावधीत संबंधितांना प्राप्त होण्यासाठी पुरवठा करण्याचा अंतिम दिनांक पुरवठाधारकास बंधनकारक करण्यात यावा.

४) पुर्व शालेय शिक्षण संच (PSE Kits) खेळणी साहित्य पुरवठा केलेल्या बाबीवर आयसीडीएस अंतर्गत वापरासाठी / शासनामार्फत पुरवठा असा शिक्का मारलेला किंवा लेबल लावलेला असावा. पुर्व शालेय शिक्षण संच (PSE Kits) खेळणी साहित्य वाटप/ पुरवठा व खर्च यामध्ये अनियमितता झाल्यास वा लेखा

आक्षेप उद्भवल्यास त्याची जबाबदारी आयुक्त, एकात्मिक बाल विकास सेवा योजना, महाराष्ट्र राज्य, नवी मुंबई यांची राहील.

५) पुर्व शालेय शिक्षण संच (PSE Kits) खेळणी साहित्याचा लाभ लाभार्थ्यांना पोहचावा, याद्दष्टीने स्वयंस्पष्ट माहिती अंगणवाडीतील नोंदवहीमध्ये उत्पादनाचा दिनांक / एकूण पुरवठा / एकूण उपयोग याबाबतची योग्य नोंद ठेवणे, इत्यादी बाबत उचित मार्गदर्शक सूचना आयुक्त, एकात्मिक बाल विकास सेवा योजना,महाराष्ट्र राज्य, नवी मुंबई यांनी द्याव्यात.

६) सदर आदेशानुसार मागणीप्रमाणे विहित प्रमाणात, विहित केलेल्या गुणवत्तेनुसार प्रत्यक्षात पुरवठा झालेला आहे, याची खात्री झाल्यावरच जेवढया जिल्हयांचा पुरवठा पुर्ण झालेला असेल व त्यांची पुरवठा झाल्याची चलने प्राप्त झालेली असतील त्या जिल्हयांची देयक अदा करण्यात यावीत. यासाठी आयुक्त, एकात्मिक बाल विकास सेवा योजना, महाराष्ट्र राज्य, नवी मुंबई हे जबाबदार राहतील.

७) उद्योग, ऊर्जा व कामगार विभागाच्या दिनांक १ डिसेंबर, २०१६ च्या शासन निर्णयातील खरेदी धोरणातील तरतुदीचे काटेकोरपणे पालन करण्यात यावे.

८) निविदाधारकांनी निविदा भरताना पुर्व शालेय शिक्षण संच (PSE Kits) खेळणी साहित्याचा जो नमुना आयुक्तालयास सादर केलेला आहे त्याच साहित्याचा पुरवठा पुरवठाधारकाकडून करण्यात आलेला आहे याची शहानिशा आयुक्त, एकात्मिक बाल विकास सेवा योजना, महाराष्ट्र राज्य, नवी मुंबई यांनी करुन घ्यावी.

३. सन २०२२-२३ या आर्थिक वर्षात पूर्व शालेय शिक्षण अंतर्गत केंद्र हिस्सा (६० टक्के) व राज्य हिस्सा (४० टक्के) याप्रमाणे प्राप्त झालेली तरतूद SNA खात्यावर जमा करण्यात आली आहे. सदर उपलब्ध तरतुदीमधून सन २०२३-२४ या आर्थिक वर्षात वरील प्रयोजनाचा खर्च भागविण्यात यावा.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०४२६१६५९२१९८३० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

VILAS RAMDAS THAKUR

Digitally signed by VILAS RAMDAS THAKUR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=GENERAL ADMINISTRATIVE DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=cb156fb408217396128e8dcaeed3f6fa70d9fd209eb9efc83bdd68b308614534, pseudonym=0C1F32A58D287A0C045C67DAD03DE47983D76037, serialNumber=C8B1E52C5C4F922AB6EB7A0B44101C838AEA34F29FBFF0AEBE9D85C3DE3468C2, cn=VILAS RAMDAS THAKUR
Date: 2023.05.03 14:22:22 +05'30'

**(वि. रा. ठाकूर)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) मा. मंत्री, महिला व बाल विकास यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
२) आयुक्त, एकात्मिक बाल विकास सेवा योजना,महाराष्ट्र राज्य, रायगड भवन, नवी मुंबई.
३) सर्व विभागीय उपायुक्त (महिला व बाल विकास)
४) सर्व जिल्हा कार्यक्रम अधिकारी(महिला व बाल विकास),जिल्हा परिषद
५) सर्व बाल विकास प्रकल्प अधिकारी ( ग्रामीण/नागरी/आदिवासी) प्रकल्प
६) महालेखापाल, महाराष्ट्र-१, मुंबई

७) महालेखापाल, लेखा परिक्षा, महाराष्ट्र-१, मुंबई

८) महालेखापाल, लेखा व अनुज्ञेयता, महाराष्ट्र-२, नागपूर

९) महालेखापाल, लेखा परिक्षा, महाराष्ट्र-२, नागपूर

१०) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.

११) जिल्हा कोषागार अधिकारी,ठाणे

१२) अपर कोषागार अधिकारी, सीबीडी, बेलापूर,नवी मुंबई

१३) निवासी लेखापरिक्षा अधिकारी,मुंबई

१४) निवड नस्ती -का-६.